**मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई, अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई व व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२२/प्र.क्र.२०/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ०४ एप्रिल, २०२२**

**संदर्भ :** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२१/प्र.क्र.७३/प्रशासन-१ दि. १२ ऑक्टोबर, २०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. २२ फेब्रुवारी, २०२२
३) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि. २७ जानेवारी, २०२२ रोजीचे पत्र.
४) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांचे दि. २३ मार्च, २०२२ रोजीचे पत्र.
५) व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांचे दि.३१ जानेवारी, २०२२ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई (२) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई व (३) व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांच्याकडील अस्थायी पदे दि. ०१ सप्टेंबर, २०२१ ते दि. २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

**२.** आता या शासन निर्णयान्वये (१) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई (२) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई व (३) व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील **नियमित अस्थायी आस्थापनेवरील ३३ पदे** सोबत दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून **दिनांक ०१ मार्च, २०२२ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२** पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

**३.** या बाबीवरील खर्च मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई या कार्यालयातील पदांसाठी " २०५९ - सार्वजनिक बांधकामे

८० - सर्वसाधारण, ००१ - संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग / उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९ - सार्वजनिक बांधकामे, ८० - सर्वसाधारण - ००१ - संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई या कार्यालयासाठीचा खर्च हा "२२१७-नगर विकास, २२१७०२३४-००१-१ संचालक, बी.डी.डी. चाळी, ०१ वेतन " या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. २२ फेब्रुवारी, २०२२ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०४१५२७३६६९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2022.04.04 15:29:52 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**-१) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
४) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
५) व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई
६) संबंधित कोषागार / उप कोषागार अधिकारी
७) वित्त विभाग (व्यय-११) / (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन प्रशासन-१ (**निवडनस्ती)**

## विवरणपत्र (१) नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२२ पासून दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | १८ | ० | ० | १८ |
| २ | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सा.बां. विभाग, नवी मुंबई | ०८ | ० | ० | ०८ |
| ३ | व्यवस्थापक, विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई | ०७ | ० | ० | ०७ |
| | **एकूण** | **३३** | **०** | **०** | **३३** |